उच्चश्रेणी लघुलेखक पदावरुन निवडश्रेणी लघुलेखक
पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांक : एएससी १५२२/प्र.क्र.२२४/१४-अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: ३१ जुलै, २०२३

## शासन आदेश

सन २०२२-२०२३ या निवडसूची वर्षामध्ये मंत्रालयीन विभागातील खालील उच्चश्रेणी लघुलेखक [गट (ब) अराजपत्रित – वेतनश्रेणी एस १६ रु.४४,९०० - १,४२,४००/- ] यांना निवडश्रेणी लघुलेखक [गट (ब) राजपत्रित- वेतनश्रेणी एस १७ रु.४७,६०० - १,५१,१००/- ] पदावर या आदेशाद्वारे विहित अटीच्या अधिनतेने निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे. तसेच सदर उच्चश्रेणी लघुलेखक यांची पदोन्नतीनंतर त्यांच्या नावासमोर स्तंभ-५ मध्ये दर्शविलेल्या विभागामध्ये पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उच्चश्रेणी लघुलेखकाचे नाव | व्यक्तीचा प्रवर्ग | सध्याचा विभाग | निवडश्रेणी लघुलेखक पदावर पदोन्नती नंतर पदस्थापनेचा विभाग |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्रीमती नी.प.बाळसराफ (नी.य.गंगावणे) | अजा | महिला व बालविकास विभाग | महसूल व वन विभाग |

२. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र.२७९७/२०१५ मध्ये दि.४.८.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. या आदेशाविरुध्द मा.सर्वोच्च न्यायालयात शासनाने दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या न्यायनिर्णयाच्या अधीन राहून तसेच पुढील अटीच्या अधीन राहून श्रीमती बाळसराफ, उच्चश्रेणी लघुलेखक यांना निवडश्रेणी लघुलेखक संवर्गात रिक्त पदावर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे:-

**सदरची पदोन्नती ही प्रशासकीय निकड म्हणून तात्पुरत्या स्वरुपातील पदोन्नती राहील**.

१) सदर पदोन्नत्या, सद्य:स्थितीत उच्चश्रेणी लघुलेखक या पदाच्या ज्येष्ठता यादीबाबत कोणतेही न्यायालयीन प्रकरण प्रलंबित नाही, तसेच या ज्येष्ठता यादीस आव्हानित देखील करण्यात आलेले नाही ही वस्तुस्थिती विचारात घेऊन केवळ तात्पुरत्या स्वरुपात देण्यात येत आहेत.

२) **सदर पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात असून सदर पदावर संबंधितांचा कायमस्वरुपी धारणाधिकार राहणार नाही**.

३) सन २०२२-२०२३ या निवडसूची वर्षाकरिता पात्र उच्चश्रेणी लघुलेखक यांची निवडसूची तात्पुरत्या स्वरुपाची असून निवडश्रेणी लघुलेखक पदावरील पदोन्नत्या ह्या तात्पुरत्या स्वरुपाच्या आहेत. **परिणामी निवडसूचीतील उच्चश्रेणी लघुलेखकांना निवडश्रेणी लघुलेखक नियमित पदाचे व सेवा ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क मिळणार नाहीत.**

४) श्रीमती बाळसराफ, उच्चश्रेणी लघुलेखक यांनी निवडश्रेणी लघुलेखक पदावरील तात्पुरती पदोन्नती न स्विकारल्यास सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्र. एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दिनांक १२.०९.२०१६ अन्वये त्यांचे नांव सन २०२२-२०२३ या वर्षीच्या निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल व पुढील दोन वर्षी होणाऱ्या निवडसूच्यांमध्ये त्यांच्या नावाचा विचार न करता तिसऱ्या वर्षाच्या निवडसूचीत निवडश्रेणी लघुलेखक पदावरील तात्पुरत्या पदोन्नतीसाठी त्यांची पात्रता तपासण्यात येईल.

५) श्रीमती बाळसराफ, उच्चश्रेणी लघुलेखक यांची निवडश्रेणी लघुलेखक पदावरील तात्पुरती पदोन्नती ही त्यांच्याविरुध्द प्रस्तुत आदेशाच्या दिनांकापर्यत कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी सुरु झालेली नाही वा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे. संबंधित विभागाने याची खातरजमा करावी.

६) मागास प्रवर्गातील उच्चश्रेणी लघुलेखक यांची पदोन्नती ही शासन निर्णय दिनांक २५.०५.२००४ मधील तरतूदीनुसार त्यांना आरक्षणाचा लाभ मिळून सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत तसेच सदर उच्चश्रेणी लघुलेखकांचे जात वैधता प्रमाणपत्र संबंधित जातपडताळणी समितीने निर्गमित केले आहे या अटीच्या अधीन राहून करण्यात येत आहे. संबंधित विभागाने याची खातरजमा करावी.

७) हे आदेश तात्काळ अंमलात येतील. निवडश्रेणी लघुलेखक पदावर पदोन्नत झालेल्या उच्चश्रेणी लघुलेखक यांना संबंधित विभागाने तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच शासन अधिसूचना दिनांक २१.६.२०२१ मधील परिच्छेद (ड)(३) नुसार पदोन्नत उच्चश्रेणी लघुलेखक यांनी पदस्थापना केलेल्या विभागात हे आदेश निघाल्याच्या तारखेपासून तीस दिवसांमध्ये रूजू व्हावे. संबंधित विभागांनी कार्यमुक्तता तसेच रुजू करुन घेतल्याच्या आदेशाच्या प्रती या विभागास पाठवाव्यात.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०७३११७५९०५९७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3DB67D519F7D7899F46BEBFB7A9970706B2C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.07.31 18:00:27 +05'30'

( वि.बा.माने )

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्रीमती नी.प.बाळसराफ, उच्चश्रेणी लघुलेखक (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)

**प्रत,**

१. अ.मु.स./प्र.स./सचिव, संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग (संबंधित मंत्रालयीन विभागामार्फत)
२. सह/उप सचिव (आस्थापना), संबंधित मंत्रालयीन प्रशासकीय विभाग.
३. निवडनस्ती.